**सुधारित नियमित निवडसूची २०२३-२४ व**
**तदर्थ निवडसूची २०२३-२४:**
***"पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त (असंवर्ग)"* या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
**शासन आदेश क्र.रापोसे-०७२४/प्र.क्र.६५/पोल-१अ.**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
दिनांक : २९ ऑगस्ट २०२४

**संदर्भ** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या.-१२, दिनांक ०१/०८/२०१९.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/१/७४३०/निसू-२०२३-२४/पो.अधि./६७/२०२४, दिनांक २५/०४/२०२४, ०५/०७/२०२४, २६/०७/२०२४ व १४/०८/२०२४.

४) शासन पत्र, गृह विभाग, क्र.रापोसे-०७२४/प्र.क्र.६५/पोल-१अ, दिनांक २०/०६/२०२४, ११/०७/२०२४, १३/०८/२०२४ व २३/०८/२०२४.

**शासन आदेश:**

"पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त (असंवर्ग)" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील अधिका-यांच्या **"सुधारित नियमित निवडसूची २०२३-२४"** यामध्ये सामाविष्ट, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिका-यांना, तात्पुरत्या स्वरुपात, खालील अटींवर, पदोन्नती देण्यात येत असून त्यांची स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदांवर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. (१) | पोलीस अधिका-याचे नाव (श्री./श्रीम.) (२) | पदोन्नतीने पदस्थापना (३) |
|---|---|---|
| १. | नरसिंग पंचम यादव | नियंत्रक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई |
| २. | सोमनाथ फकिरा वाघचौरे | समादेशक, रा.रा. पोलीस बल, गट क्र.५, दौंड |
| ३. | निलेश मनोहर पांडे | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, अकोला |
| ४. | प्रशांत श्रीराम अमृतकर | समादेशक, रा.रा. पोलीस बल, गट क्र.१६, कोल्हापूर |
| ५. | आण्णासाहेब मारुती जाधव | पोलीस अधीक्षक, नागरी हक्क संरक्षण, नाशिक |
| ६. | सदाशिव शरणप्पा वाघमारे | पोलीस अधीक्षक, नागरी हक्क संरक्षण, नागपूर |

<u>शासन आदेश क्र.रापोसे-०७२४/प्र.क्र.६५/पोल-१अ.</u>

**अटी:-**

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

४) उक्त निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याच्या अधीन तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

२. तसेच, "पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त (असंवर्ग)" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील अधिका-यांच्या **"तदर्थ निवडसूची २०२३-२४"** यामध्ये सामाविष्ट, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिका-यास, तात्पुरत्या स्वरुपात, खालील अटींवर, तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदावर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| <u>अ.क्र.</u> (१) | <u>पोलीस अधिका-याचे नाव (श्री./श्रीम.)</u> (२) | <u>पदोन्नतीने पदस्थापना</u> (३) |
|---|---|---|
| १. | निलेश नानाभाऊ सोनवणे | पोलीस उप आयुक्त, बिनतारी सागरी विभाग, नवी मुंबई |

**अटी:-**

१) उक्त पदोन्नती ही तदर्थ पदोन्नती *(Adhoc Promotion)* आहे.

२) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) उक्त पदोन्नती दिलेल्या अधिका-यांना सेवाज्येष्ठतेचा कोणताही लाभ मिळणार नाही.

५) उक्त पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यांसाठी यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

६) प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिका-यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी "पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त (असंवर्ग)" या संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास, तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिका-यांची तदर्थ पदोन्नती संपुष्टात आणण्यात येईल.

३. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/न्यायालय यांचे आदेश, निवडणुकीची आदर्श आचारसंहिता, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

४. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.-/२०२४/का.-१२ (सेवा-३), दिनांक १४/०६/२०२४ व ०९/०८/२०२४]* आणि पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांच्या शिफारशीचा यथायोग्य विचार करुन महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न मध्ये निर्दिष्ट सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, यांच्याशी विचारविनिमय करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२९१८३०१२५९२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2024.08.29 18:46:30 +05'30'

**(संदीप गो. ढाकणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक/पोलीस उप महानिरीक्षक.
६) सर्व पोलीस आयुक्त.
७) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.
८) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*
९) निवड नस्ती, पोल-१अ.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/ लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.